शहापूर देर्डा व ३ गांवे ता.गंगापूर जि.औरंगाबाद
पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास
व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र.पापुयो-२०१०/प्र.क्र.२८/पापु-१८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २० ऑक्टोंबर २०१०

संदर्भ:- १) शा.नि.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ववेका-१०९८/प.क्र.४४५(अ)/पापु १०, दि.१/६/१९९८

२) शासन पत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.बैठक- २००९/प्र.क्र.२२४/पापु-०६, दि.३१/१२/२००९.

प्रस्तावना :-

शहापूर देर्डा व ३ गांवे ता.गंगापूर जि.औरंगाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या रु.११४.९७ लक्ष रकमेच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर नमूद केलेल्या दि.१/६/१९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या हेतूने स्थापन करण्यात आलेल्या वित्त विभाग, नियोजन विभाग व या विभागातील आणि क्षेत्रिय स्तरावरील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांच्या छोटया गटाने दिनांक २५/११/२००९ रोजीच्या बैठकीत सदर योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची शिफारस केली आहे. सदर बैठकीचे इतिवृत्त वर नमूद केलेल्या दि.३१/१२/२००९ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, औरंगाबाद यांच्याकडून प्राप्त झालेल्या शहापूर देर्डा व ३ गांवे ता.गंगापूर जि.औरंगाबाद या पाणी पुरवठा योजनेला सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने शहापूर देर्डा व ३ गांवे ता.गंगापूर जि.औरंगाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या रु.२०७.२४ लक्ष (रुपये दोन कोटी सात लक्ष चोवीस हजार फक्त) किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास व आराखडयास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून वर्धित वेग व किमान गरजा कार्यक्रमांतर्गत करावयाच्या तरतुदीचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आला आहे.

२. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरीच्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत. त्यांचे काटेकोरपणे पालन करावे,तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत, त्यांचेही पालन करण्यात यावे. ही योजना सुधारीत रु.२०७.२४ लक्ष एवढया किंमतीतच पूर्ण करुन

हस्तांतरीत करण्याच्या व पाणीपट्टी दरात उचीत वाढ करण्याच्या अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

४. ही योजना शहापूर देर्डा व ३ गावांसाठी असल्याने ती पूर्ण झाल्यावर पुढील दैनंदिन देखभाल व दुरुस्तीसाठी संबंधित जिल्हापरिषदेच्या ताब्यात देण्यात येईल. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, यांच्याकडून योजना प्रत्यक्षांत पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत सदर योजना ताब्यात घेण्यास संबंधित जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संबंधित अभियंत्यांनी व जिल्हापरिषदेच्या संबंधित अधिकाऱ्यांनी संयुक्तपणे पहाणी करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५. ही योजना राबविणे , त्याचे परिरक्षण दुरुस्त्या ( विशेष दुरुस्त्या धरुन ) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीकरण निधीसाठी किंवा योजनेच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारता येणाऱ्या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल असे बघण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची/जिल्हा परिषदेची राहील. त्यानुसार या योजनेसाठी पाणीपट्टीचा दर आकारण्यांत यावा. याप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण झाली नाही तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च ग्रामपंचातीस/जिल्हा परिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल.

६. या योजनेवर होणारा वाढीव खर्च "मागणी क्र. वाय-२, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता - ०१ पाणी पुरवठा- १०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०२) (०१) (डब्ल्यूएस-६) (राज्यक्षेत्र) पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषद यांना अनुदाने (२२१५ १२१७) ४१ सहायक अनुदाने " या अर्थसंकल्पीय शिर्षाच्या खाती टाकावा व त्याखालील उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागवावा.

७. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७६/१०/व्यय-३,दि. ३.०८.२०१० नुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१०२०१७४४०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

sd/-

( ब.धों. चिंचकर )

कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन .

प्रति,

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई २१
३. जिल्हाधिकारी, औरंगाबाद
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद
५. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
६. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद
७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, औरंगाबाद
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा जिल्हा परिषद, औरंगाबाद
९. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे ४११ ०३७
१०. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
११. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर
१४. महालेखापाल, (लेखा व परिक्षण) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर
१५. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद
१६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१७. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
१८. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, यांचे खाजगी सचिव
१९. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता , यांचे खाजगी सचिव
२०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र.पापु-४,०५,०६,०९,१०, १३, १७,व संगणक कक्ष.
२१. मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
२२. निवड नस्ती ( पापु-१८ )

# सहपत्र

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.पापुयो २०१०/प्र.क्र.२८/पापु-१८,
दिनांक २०/१०/२०१० चे सहपत्र.

(किंमत: रु.लाखात)

| योजनेचे नाव | योजनेची मूळ मंजूर किंमत | | | योजनेची सुधारित किंमत | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | एकूण | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत सुधारित तरतूद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत सुधारित तरतूद | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| शहापूर देर्डा व ३ गांवे ता.गंगापूर जि.औरंगाबाद पाणी पुरवठा योजना | ९३.४८ | २१.४९ | ११४.९७ | ९३.४८ | ११३.७६ | २०७.२४ (रु.९२.२७ लक्ष वाढीव खर्च) |

**Sd/-**
( ब.धों. चिंचकर )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन .